महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत बारामती
शहर पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास
पुनर्सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
नगर परिषद, बारामती

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सुनिअ-२०२०/प्र.क्र.१२७/पापु.२२**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, फोर्ट,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२ जानेवारी, २०२२

वाचा :
१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२.२००८
३) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे यांचे पत्र क्र.मु.अ.(पुणे)/तांशा-४/४०६१, दि.०३.११.२०११.
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२००९/प्र.क्र.१७७/पापु-२२, दि.२६.०८.२००९
५) शासन पत्र, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१०/प्र.क्र.४३४/पापु-२२, दि.०९.११.२०१०
६) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०११/प्र.क्र.५७०/पापु-२२, दि.१५.१०.२०११
७) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१३/अनुदान/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.३०.०३.२०१३
८) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१३/प्र.क्र.४४४/पापु-२२, दि.३१.०७.२०१३
९) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.४११/पापु-२२, दि.२३.०२.२०१६
१०) मुख्याधिकारी, बारामती नगर परिषद यांचे पत्र जा.क्र.बानप/कार्या-१९/सुनिअ/१११४/२०१८, दि.०५.०१.२०१८
११) शासन निर्णय,वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.४.२०२०
१२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.४११/पापु-२२, दि.१७.०३.२०२१
१३) वित्त विभाग, शासन पत्र क्र.व्यअस-२०२१/प्र.क्र.१४३/अर्थ-२, दि.९.१२.२०२१.

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दि.२२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि.२६.०८.२००९ व दि.१५.१०.२०११ (सुधारीत प्रस्ताव) अन्वये बारामती शहर पाणी पुरवठा योजनेच्या रु.२७,८४,७३,४२९/- इतक्या किमतीच्या भांडवली तसेच सुधारणा कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. बारामती ही “ क ” वर्ग नगर परिषद आहे. त्याप्रमाणे सदर योजनेस रु.२५,०६,२६,०८६/- इतके अनुदान (९०%) अनुज्ञेय असून बारामती नगर परिषदेच्या स्वहिश्श्याची (१०%) रक्कम रु.२,७८,४७,३४३/- आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण पुणे विभाग पुणे यांनी संदर्भ क्र.३ येथील दि.०३.११.२०११ च्या पत्रान्वये बारामती शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु.२७,८४,७३,४२९/- इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता दिली आहे. बारामती नगर परिषदेने स्वहिश्श्याची (१०%) रक्कम रु.२,७८,४७,३४३/- संबंधित बँक खात्यामध्ये जमा केलेली आहे. सदर योजनेकरीता अनुज्ञेय अनुदानापैकी यापूर्वी शासन निर्णय, दि.०९.११.२०१० अन्वये रु.३६०.११ लक्ष, शासन निर्णय, दि.३०.०३.२०१३ अन्वये रु.८९९.९९ लक्ष, शासन निर्णय, दि.३१.०७.२०१३ अन्वये रु.९००.०० लक्ष व दि.२३.२.२०१६ अन्वये रु.९५.५३ लक्ष व दि.१७.०३.२०२१ च्या शासन निर्णयान्वये रु.२५०.६३ लक्ष असे मिळून एकूण रु.२५,०६,२६,०८६/- इतके संपुर्ण (९०%) अनुदान बारामती नगर परिषदेस वितरीत करण्यात आलेले आहे. मुख्याधिकारी, बारामती नगर परिषद यांनी एकूण रु.४६,२८,१४,६७४/- इतक्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. सदर योजनेंतर्गत मंजूर भांडवली कामे व सुधारणा कामे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे यांचेमार्फत पुर्ण निधी ठेव तत्वावर करण्यात येत आहे. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, पुणे यांनी दि.२३.१०.२०२० च्या पत्रान्वये बारामती शहर पाणी पुरवठा योजनेतील मंजूर कामांपैकी एकूण १००% कामे पूर्ण झाली असल्याबाबतचा भौतिक प्रगती अहवाल सादर केला आहे. तसेच सदर योजनेवर होणा-या खर्चाचे Overall Excess/Saving Statement सादर केले असून त्यामध्ये रु.१९,८७,८५,०००/- इतका जादा खर्च होणार असल्याचे नमूद केले आहे.

३. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रादेशिक विभाग, पुणे यांचे दि.२१.०८.२०२० च्या पत्रान्वये रु.४७,७२,५८,८८५/- इतक्या ढोबळ भांडवली व सुधारीत किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारित तांत्रिक मंजूरी दिली आहे. सदर तांत्रिक मंजूरीमध्ये ७१.३८ टक्क्यांनी वाढ झालेली आहे. महाराष्ट्र सुजल निर्मल अभियांनातर्गत बारामती शहर पाणी पुरवठा योजनेसंदर्भात मा.उपमुख्य मंत्री तथा वित्त मंत्री महोदय यांचे अध्यक्षतेखाली दि.२३.०६.२०२० रोजी झालेल्या बैठकीत मा.उप मुख्यमंत्री महोदय यांनी दिलेल्या निर्देशानुसार बारामती नगर परिषद यांचेकडून प्राप्त झालेला रु.४७,७२,५८,८८५/- इतक्या ढोबळ किंमतीचा प्रस्ताव व्यय अग्रकम समितीसमोर ठेवण्यापूर्वी नगर विकास विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागास सादर करण्यात आला. बारामती नगर परिषदेने सदर योजनेच्या पुनर्सुधारीत

रु.४७,७२,५८,८८५/- (ढोबळ) इतक्या किंमतीपैकी रु.४६,२८,१४,६७४/- इतका निधी खर्च केलेला असून सदर प्रकल्प पूर्ण होण्यासाठी रु.९९,८२,०००/- इतका निधी आवश्यक असल्याचे मुख्याधिकारी, बारामती नगर परिषद यांनी दि.९.१०.२०२० च्या पत्रान्वये कळविल्यानुसार प्रस्तावित पुनर्सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर सदर निधी नगर परिषदेस उपलब्ध करुन देण्यात येणार असल्याचे पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने नमूद केले आहे. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता तथा प्राधिकरणाचे पदसिध्द अध्यक्ष यांच्या अध्यक्षतेखाली दि.२९.०३.२०१२ रोजी झालेल्या निविदा समितीच्या ७७ व्या बेठकीत, निविदा समितीने निविदा मंजूर करताना " सदर वाढीव दरामुळे व सदरची योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने पुर्ण ठेव तत्वावर घेतली असल्याने वाढीव खर्चाबाबत बारामती नगर पालिकेचे ना-हरकत प्रमाणपत्र आवश्यक असून, सदरचा वाढीव निधी उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी नगरपालिकेची राहील " या अटीच्या अधीन निविदा स्वीकृत केलेली आहे. सबब, निविदा समितीच्या अटीनुसार प्रस्तावित पुनर्सुधारित योजनेंतर्गत आवश्यक असलेल्या रु.९९,८२,०००/- इतक्या निधीची उभारणी बारामती नगरपरिषदेनेच करणे आवश्यक आहे. यासाठी शासनाकडून निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही. प्रस्तूत प्रकल्प पूर्ण करण्यासाठी आवश्यक निधी बारामती नगरपरिषदेने उभा करणे आवश्यक राहील या अधीन तसेच विभागाने ७% ETP Charges सह रु.४७,७२,५८,८८५/- इतक्या किंमतीच्या पुनर्सुधारीत प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रस्तावित केले. मात्र सदर मूळ योजना सुधारित केल्यानंतर पुन्हा ती पुनर्सुधारीत करण्यासाठी सादर करण्यात आलेली असून मूळ व सुधारीत अंदाजपत्रकामध्ये ७% ETP Charges मान्य करण्यात आले होते. सबब, पुनर्सुधारीत प्रस्तावात भांडवली कामे एकूण रु.४३,३९,८५,५००/- या रकमेवर आकारण्यात आलेली ७% ETP Charges ची रु.३,०३,७८,९८५/- रक्कम वगळून रु.४४,६८,७९,९००/- इतक्या (ढोबळ) किंमतीचे पुनर्सुधारीत अंदापत्रक व्यय अग्रक्रम समितीपुढे सादर करण्यास वित्त विभागाने कळविले आहे. त्यानुसार सदरचा प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीसमोर सादर करण्यात आला. त्यास व्यय अग्रक्रम समितीने दि.२५.११.२०२१ च्या बैठकीत सहमती दर्शविली असल्याचे वित्त विभागाने दि.९.१२.२०२१ च्या पत्रान्वये कळविले आहे. बारामती नगर परिषदेने दि.९.१०.२०२० च्या पत्रान्वये केलेल्या विनंती अनुषंगाने भांडवली कामांवर आकारण्यात आलेली ७% ETP Charges ची रु.३,०३,७८,९८५/- रक्कम वगळून रु.४४,६८,७९,९००/- इतक्या किमतींच्या प्रस्तावास पुनर्सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, बारामती शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली व सुधारणा कामांकरिता शासन निर्णय, दि.२६.०८.२००९ व दि.१५.१०.२०११ (सुधारीत प्रस्ताव) अन्वये

प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या रु.४४,६८,७९,९००/- (रुपये चौवेचाळीस कोटी अडुसष्ठ लाख एकोणऐंशी हजार नऊशे फक्त) इतक्या किंमतीच्या पुनर्सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. बारामती शहर पाणी पुरवठा योजनेसाठी उपांगनिहाय मंजूर व सुधारित किंमतीचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | योजनेतील मंजूर उपांगे | शासन निर्णय, दि.२६.०८.२००९ व दि.१५.१०.२०११ (सुधारीत प्रस्ताव) नुसार मंजूर किंमत | सुधारीत किंमत |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| | दोन बॅलन्सिंग टॅंकच्या तांत्रिक बदलामुळे झालेल्या फरकाची किंमत (३५५ द.ल.लि.क्षमतेचा साठवण तलाव) | रु. २२,९१,३२,७५०/- | रु. ४२,६५,६२,८००/- |
| | जलशुध्दीकरण केंद्र व पाण्याच्या टाक्यांची दुरुस्ती | रु. १,७१,०४,१००/- | रु.७४,२२,७००/- |
| | **एकूण** | **रु. २४,६२,३६,८५०/-** | **रु. ४३,३९,८५,५००/-** |
| | ई.टी.पी.७% | रु.१,७२,३६,५७९/- | **निरंक** |
| | **एकूण** | **रु. २६,३४,७३,४२९/-** | **रु. ४३,३९,८५,५००/-** |
| | **सुधारणा कामे** | | |
| | ग्राहक सर्वेक्षण, पाणी लेखापरीक्षण, उर्जा लेखापरीक्षण, फ्लो मिटर बसविणे, हॅड्रोलिक मॉडेलिंग, जीआयएस मॅपिंग, बिलींग व वसुली संगणकीकरण. | **रु.**१,५०,००,०००/- | रु.१,२८,९४,४००/- |
| | **एकूण ढोबळ किंमत** | **रु. २७,८४,७३,४२९/-** | **रु. ४४,६८,७९,९००/-** |

२. संदर्भाधीन १३ येथील वित्त विभाग, शासन पत्र क्र. व्यअस-२०२१/प्र.क्र.१४३/अर्थ-२, दि.०९.१२.२०२१ नुसार दि.२५.११.२०२१ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीमध्ये बारामती शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली व सुधारणा कामांच्या रु.४४,६८,७९,९००/- इतक्या किमतींच्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आलेली आहे.

३. महाराष्ट्र सुजल निर्मल अभियानांतर्गत बारामती शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली व सुधारणा कामांस दि.२६.०८.२००९ व दि.१५.१०.२०११ (सुधारित प्रस्ताव) च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता तथा प्राधिकरणाचे पदसिध्द अध्यक्ष यांच्या अध्यक्षतेखाली दि.२९.०३.२०१२ रोजी झालेल्या निविदा समितीच्या ७७ व्या बैठकीत, निविदा समितीने निविदा मंजूर करताना

" सदर वाढीव दरामुळे व सदरची योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने पुर्ण ठेव तत्वावर घेतली असल्याने वाढीव खर्चाबाबत बारामती नगर पालिकेचे ना-हरकत प्रमाणपत्र आवश्यक असून, सदरचा वाढीव निधी उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी नगरपालिकेची राहील " या अटीच्या अधीन निविदा स्वीकृत केलेली आहे. सबब, प्रस्तूत प्रकल्प पूर्ण करण्यासाठी आवश्यक वाढीव निधी बारामती नगरपरिषदेने उभा करणे आवश्यक राहील. त्यासाठी शासनाकडून वाढीव निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

५. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या दिनांक १७.०४.२०१५ च्या क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनियम भाग-२ या शासन निर्णयातील वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका,१९७८ मधील भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्रमांक २७ (अ) अन्वये विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय हा नगर विकास विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१, दि.२१.११.२०२०, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८२/व्यय-३, दि.२५.०२.२०२१, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३९३, दि.२०.७.२०२१ व वित्त विभाग, शासन पत्र क्रमांक :- व्यअस-२०२१/प्र.क्र.१४३/अर्थ-२, दि.९ डिसेंबर, २०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११२१२०५०८३३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

POPAT BHANUDAS JAGADALE

Digitally signed by POPAT BHANUDAS JAGADALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d681616973b9509460f63155f2d1d3dffe33d046d2adc8504f466852619624e, pseudonym=DD30C0827CDC59A4ECB71996AF188F1DA9802A3D, serialNumber=48EF41A6A6D899B8BCF71B256164BA84DEF4261D73071D543D129EFBC0C5B6FF, cn=POPAT BHANUDAS JAGADALE
Date: 2022.01.12 13:20:49 +05'30'

**( पो.भा. जगदाळे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत ,

१. मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

६. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी.जी.ओ.इमारत, न्यु मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हील लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर- ४४० ००१.
१२. विभागीय आयुक्त, महसूल विभाग, पुणे.
१३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ४ था मजला, एक्सप्रेस टॉवर्स, नरीमन पॉईंट, मुंबई-२१.
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२. (५ प्रतीसह)
१५. आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालयालय, सर पोचखानवाला रोड, वरळी,मुंबई-३०.
१६. जिल्हाधिकारी, पुणे.
१७. नियंत्रक अधिकारी तथा सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
१८. आहरण व संवितरण अधिकारी तथा प्रकल्प संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४. (५ प्रतीसह)
१९. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे.
२०. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे.
२१. जिल्हा प्रकल्प अधिकारी (नगरपालिका), जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे.
२२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
२३. मुख्याधिकारी, बारामती नगर परिषद, ता.बारामती, जि.पुणे.
२४. उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई- ४०० ६१४.
२५. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२६. कक्ष अधिकारी/लेखाधिकारी, पापु-०४,पापु-०५, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई- ४०० ०३२.
२८. निवडनस्ती, पापु-२२.